13 79

201103171737430001

पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण प्राधिकरणाच्या पेठ ४ मधील सार्वजनिक सुविधा जागेपैकी ४ एकर जागा डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवन उभारण्यासाठी व अनुसूचित जातीच्या मुलामुलींच्या वसतीगृहासाठी समाज कल्याण विभागास देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्र. पीसीएन ३००६/२१८३ /प्र.क्र. ४५/नवि २२

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक - २३ जानेवारी, २००८.

वाचा :- १) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र. वि.प्रा./विभाग- २/७४१, दि. १३/०९/२००६.

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र. वि.प्रा./विभाग- २/७५६६, दि. १/११/२००७. व प्राधिकरण सभा ठराव क्र. २७३ मधील निर्णय.

३) संचालक, समाज कल्याण संचालनालय यांचे पत्र क्र. सकसं/शिक्षण/शाजऊ /०६-०७ /का.१५ अ/२५८९ दि. १५.०८.२००६.

**प्रस्तावना-**

राज्य शासनाच्या संचालक, समाज कल्याण विभाग, पुणे यांनी पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण क्षेत्रात डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवन उभारण्यासाठी २ एकर तसेच अनुसूचित जातीच्या १०० मुला- मुलींच्या वस्तीगृहासाठी २ एकर अशी एकूण ४ एकर जमिनीची मागणी संदर्भांकित पत्रान्वये पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाकडे केली आहे. प्राधिकरणाने पेठ क्र. ४ मधील १.६२ हेक्टर सर्व सुविधासाठी आरक्षित जमीन राज्य शासनाच्या समाज वसतीगृहासाठी थेट पध्दतीने वाटप करण्यास प्राधिकरण सभा क्र.२७३ अन्वये मान्यता दिली आहे. प्राधिकरणाच्या भूवाटप नियम १९७३ च्या नियम ५ अन्वये शासनाच्या पूर्व मान्यतेने प्राधिकरणास थेट पध्दतीने जागाचे वाटप करण्याची तरतूद आहे. . प्राधिकरणाच्या सभेने दिलेली मान्यता विचारात घेवून, समाज कल्याण विभागास डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवन उभारण्यासाठी व अनुसूचित जातीच्या मुलामुलींच्या वसतीगृह बांधण्यासाठी १.६० व ०.४२ हेक्टर जागा थेट पध्दतीने वाटप

करण्यास भू-वाटप नियमावली १९७३ च्या नियम- ५ अन्वये मान्यता देण्यासाठा मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, यांनी प्रस्ताव सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

संचालक, समाजकल्याण यांनी केलेली मागणी तसेच प्राधिकरणाचा ठराव आणि प्रस्ताव विचारात घेवून पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाच्या पेठ क्र.४ मधील सार्वजनिक सुविधेसाठी राखीव असलेल्या जागेपैकी डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवन उभारण्यासाठी २ एकर जागा तसेच अनुसूचित जातीच्या १०० मुला-मुलींच्या वस्तीगृहासाठी २ एकर जागा अशी एकूण ४ एकर जागा राज्य शासनाच्या समाजकल्याण विभागास प्राधिकरणाच्या भूवाटप नियम १९७३ च्या नियम- ५ अन्वये वाटप करण्यास खालील अटीच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) ही जागा भविष्यात देखील संचालक, समाज कल्याण विभाग पुणे यांना ज्या कारणास्तव देण्यात आलेली आहे, त्या व्यतिरिक्त अन्य कोणत्याही कारणासाठी वापरता येणार नाही.

२) ही जागा समाज कल्याण विभागाकडून अन्य संस्थांना (खाजगी संस्था ) वाटप करता येणार नाही.

३) सदर जागा प्राधिकरण निवासी जागांच्या चालू बाजार भाव दराने देण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

23/1/10

( सुनिल कोठेकर )
कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा. मुख्यमंत्र्याचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.
२. मा. राज्यमंत्री, नगर विकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२..
३. अध्यक्ष, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे तथा ~~आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे~~ विभागीय आयुक्त, पुणे.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे
५. मा. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२ यांचे स्विय सहाय्यक.
६. निवडनस्ती, नवि २२